**महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील २२१० जी २५१ या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- मफुयो -२०२४/प्र.क्र.७९/आरोग्य-६**

गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: ०३ जून, २०२४

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दि.२६ फेब्रुवारी, २०१९.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि. १२ एप्रिल, २०२३.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. निविदा -२०२३/प्र.क्र.२३/आरोग्य-६, दि.१० एप्रिल, २०२४
४) राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई यांचे पत्र क्र. राआहसो/लेखा/प्रअ/१११६९/६९५/२०२४-२५, दि.१६ एप्रिल, २०२४.
५) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०२३/प्र.क्र.१६७/आरोग्य-६, दि.२७ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेचे महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी २२१० जी २५१ (सर्वसाधारण), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली एकूण रु.६५० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या लाभार्थ्यांसाठी संदर्भ क्र. ५ येथिल शासन निर्णयानुसार माहे एप्रिल, २०२४ ते जून, २०२४ या त्रैमासिक कालावधीसाठी अदा करण्यात आलेल्या विमा हप्त्यासाठी फरकाची रक्कम रु.४९,६७,५८,०००/-(रुपये एकोणपन्नास कोटी सदुसष्ट लक्ष अठ्ठावन्न हजार मात्र) इतका निधी २२१० जी २५१ (सर्वसाधारण), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय:-

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत होत असल्यामुळे योजनेंतर्गत लाभार्थी कुटुंबाचा दिनांक १ एप्रिल, २०२४ ते ३० जून, २०२४ या त्रैमासिक कालावधीतील विमा हप्ता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीत

केलेल्या तरतूदीतून खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षांतर्गत विमा हप्ता फरकाची रक्कम रु.४९,६७,५८,०००/-(रुपये एकोणपन्नास कोटी सदुसष्ट लक्ष अठ्ठावन्न हजार मात्र) एवढा सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. सदर रक्कमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या नावे काढण्यात यावा.

मागणी क्र. आर-१
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
(०१) नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
(०६) - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(०६) (३४)- महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना(सर्वसाधारण) (राज्य योजना)
२२१० जी २५१ (दत्तमत),
३१ -सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

२. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

1. शासनाने विहीत केलेल्या विमा दराने सदरचा निधी हा एकत्रित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या लाभार्थ्यांच्या विमाहप्त्यापोटी विमा कंपनीस प्रदान करण्यात यावा.
2. सदरचा निधी विमा कंपनीस विमाहप्ता अदा केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमून्यात आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना सादर करावे

३. सदर निधी राज्य आरोग्य हमी सोसायटी, महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना या खात्यामध्ये विमा हप्त्यासाठी रु.४९,६७,५८,०००/-(रुपये एकोणपन्नास कोटी सदुसष्ट लक्ष अठ्ठावन्न हजार मात्र) जमा करण्यासाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीकडे वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

४. वित्त विभागाने परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२ एप्रिल, २०२३ सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु. क्र. ९ मधील मूद्दा क्र. १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे राज्य आरोग्य हमी सोसायटीने शासनास कळविले असून यापुर्वी शासनाकडून वितरीत केलेल्या निधीचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता त्याच प्रयोजनासाठी केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. शासनाच्या धोरणानूसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यामध्ये जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे

त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदींचे/ अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचे अभिप्राय व वित्त विभाग अनौ.सं.क्र.२५०/२०२४/व्यय-१३ दिनांक ०३.०५.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६०३११०८५२२४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR
Date: 2024.06.03 11:50:46 +05'30'

**(सं.द.महाडेश्वर)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. ( ३ प्रती)
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
११.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती.